**भूमीसंपादन, पुनर्वसन व पुनर्वसाहत करतांना उचित भरपाई मिळण्याचा व पारदर्शकतेचा हक्क अधिनियम २०१३ चे कलम ५१ अन्वये अमरावती व नाशिक येथे नव्याने स्थापन करावयाच्या भूमीसंपादन, पुनर्वसन व पुनर्स्थापना प्राधिकरणाकरिता एकूण २६ पदे निर्माण करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.आरपीए-२०२३/प्र.क्र.१७/र-१,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक : २४.०७.२०२४.

**वाचा :-** १. शासन निर्णय क्र आरपीए-१४१५/ प्र.क्र. ४५/र-१, दि. २० डिसेंबर, २०१६
२. शासन निर्णय क्र आरपीए-१४१५/ प्र.क्र. ४५/र-१, दि. ०९ सप्टेंबर, २०१९

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने भूमीसंपादन, पुनर्वसन व पुनर्स्थापना करताना वाजवी भरपाई मिळण्याचा व पारदर्शकतेचा हक्क अधिनियम २०१३- हा नवीन अधिनियम भूमीसंपादन व पुनर्वसन यासाठी एकत्रितपणे पारित केला आहे. सदर अधिनियम दि.०१.०१.२०१४ पासून अंमलात आला असून या अधिनियमातील कलम ५१ नुसार भूसंपादन, मोबदला, पुनर्वसन आणि पुनर्स्थापना यामधील वादांचे त्वरित निरसन (speedy disposal) होण्यासाठी शासन १ किंवा अधिक प्राधिकरणाची स्थापना करण्यासाठी अधिसुचना निर्गमित करु शकते, अशी तरतूद आहे. त्यानुसार वाचा येथील शासन निर्णयान्वये राज्यातील सर्व महसूली विभागांसाठी नागपूर व छत्रपती संभाजीनगर येथे प्रत्येकी एक भूमीसंपादन, पुनर्वसन व पुनर्स्थापना प्राधिकरणाकरिता प्रत्येकी १३ प्रमाणे आवश्यक पदांची निर्मिती करण्यात करण्यात आली आहे. तथापि, सदर प्राधिकरणाकडे प्राप्त होणा- या प्रकरणांची संख्या व त्यांचा निपटारा विहीत कालावधीत करण्याच्या अनुषंगाने अमरावती व नाशिक येथे प्रत्येकी एक प्रमाणे आणखी दोन स्वतंत्र भूमीसंपादन, पुनर्वसन व पुनर्स्थापना प्राधिकरणाची स्थापन करण्यात येत असून व सदर प्राधिकरण, कार्यान्वित करण्यासाठी आवश्यक कर्मचारी वर्गाची पदे निर्माण करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

" भूमीसंपादन, पुनर्वसन व पुनर्स्थापना करताना वाजवी भरपाई मिळण्याचा व पारदर्शकतेचा हक्क अधिनियम २०१३" मधील कलम ५१ च्या तरतूदीस अनुसरुन राज्यातील अमरावती महसूल विभागाकरीता अमरावती येथे एक व नाशिक, पुणे व कोकण या तीन महसूली विभागांकरिता नाशिक येथे एक अशी नव्याने दोन स्वतंत्र भूमीसंपादन, पुनर्वसन व पुनर्स्थापना प्राधिकरण स्थापना करण्यास व स्थापन करावयाच्या या प्राधिकरणाकरिता परिच्छेद क्र.२ मध्ये नमूद करण्यात आल्यानुसार एकूण २६ पदे निर्माण करण्यास या शासन निर्णयान्वये शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. राज्याच्या नाशिक, पुणे, कोंकण या तीन महसुली विभागांकरिता नाशिक येथे व अमरावती या महसुली विभागाकरिता अमरावती येथे स्थापन करावयाच्या प्राधिकरणासाठी मंजूर पदांचा तपशील खालीलप्रमाणे आहे :-

**(अ) नियमित पदे**

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या | | |
|---|---|---|---|---|
| | | अमरावती | नाशिक | एकूण |
| १ | पीठासीन अधिकारी (जिल्हा न्यायाधिश) | १ | १ | २ |
| २ | निबंधक (उपजिल्हाधिकारी संवर्ग) | १ | १ | २ |
| ३ | अव्वल कारकून | २ | २ | ४ |
| ४ | लघुलेखक (निम्न श्रेणी) | १ | १ | २ |
| ५ | लिपिक टंकलेखक | ४ | ४ | ८ |
| | | ९ | ९ | १८ |

**ब) बाह्ययंत्रणेव्दारे घ्यावयाच्या सेवा**

| अ.क्र. | सेवा | पदसंख्या | | |
|---|---|---|---|---|
| | | अमरावती | नाशिक | एकूण |
| १ | वाहनचालक | १ | १ | २ |
| २ | शिपाई | ३ | ३ | ६ |
| | एकूण मनुष्यबळ | ४ | ४ | ८ |

(१) पीठासीन अधिकारी या पदावर नियुक्तीची कार्यवाही शासन स्तरावरून करण्यात येईल.

(२) सदर प्राधिकरणांची स्थापना व अधिकारक्षेत्र निश्चित करणारी अधिसूचना राजपत्रात प्रसिद्ध झाल्यानंतर विभागीय आयुक्त, नाशिक व अमरावती यांनी प्राधिकरणांकरीता आवश्यक असणारी पदे (पीठासीन अधिकारी व्यतिरिक्त) तात्काळ प्रतिनियुक्तीने भरण्याबाबत कार्यवाही करावी.

(३) पीठासीन अधिकारी या पदावर जिल्हा न्यायाधीश संवर्गातील न्यायिक अधिका-याची नियुक्ती मा. मुंबई उच्च न्यायालय यांनी केलेल्या शिफारशीनुसार करण्यात येईल.

(४) प्राधिकरणाच्या निबंधक पदावर उपजिल्हाधिकारी संवर्गातील अधिकारी असेल व सदर पद हे प्रतिनियुक्तीव्दारे भरण्यात येईल.

(५) वाहन चालक- २ व शिपाई ६ अशी एकुण ८ पदे वाह्य यंत्रणेमार्फत भरण्यात यावीत.

(६) सदर प्राधिकरणांच्या कार्यालयासाठी आवश्यक ती जागा विभागीय आयुक्त कार्यालय, अमरावती व नाशिक येथे उपलब्ध करुन देण्यात यावी.

(७) अमरावती व नाशिक येथील प्राधिकरणावर कार्यरत पीठासीन अधिकारी यांना वाहन अनुज्ञेय करण्यात येत आहे. त्यास अनुसरुन पीठासीन अधिकारी यांना जिल्हा न्यायाधिश संवर्गातील न्यायिक अधिका-यास अनुज्ञेय असलेले वाहन खरेदी करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(८) सदर प्राधिकरणांची स्थापना व अधिकारक्षेत्र निश्चित करणारी अधिसूचना राजपत्रात प्रसिद्ध झाल्यानंतर प्राधिकरण कार्यान्वित करण्यासाठी व वाहन खरेदीसाठी आवश्यक असणारा निधी मागणीचा प्रस्ताव संबंधित विभागीय आयुक्त यांनी शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय वित्त विभागाचे अनौ. सं क्र १४६/१४७५ , दि १३.०६.२०२३ च्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात येत आहे. त्याचा संकेतांक २०२४०७२५११०५९११६३१९ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने

KEDARPRATAP
JAYSING PATIL

Digitally signed by KEDARPRATAP JAYSING PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=8a304b555c16c6333932e94031b478a58b30bb35922ff7cfdc101bf31d56ff8d, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=3847160374ED91C72AF7F541ED5885A54E39968A0CDDD47C85355D5B730A40BF, cn=KEDARPRATAP JAYSING PATIL
Date: 2024.07.25 11:14:00 +05'30'

**( केदारप्रताप पाटील )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल महोदयांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३) मा. उप मुख्यमंत्री ( वित्त) यांचे खाजगी सचिव
४) मा. उप मुख्यमंत्री ( जलसंपदा) यांचे खाजगी सचिव
५) मा.मंत्री, मदत व पुनर्वसन यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
६) मा. राज्यमंत्री (म. व पु.) यांचे खाजगी सचिव,
७) सचिव ( मदत व पुनर्वसन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
८) सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
९) महालेखापाल (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई
१०) महालेखापाल (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर,
११) सर्व विभागीय आयुक्त,
१२) सर्व जिल्हाधिकारी, सर्व अतिरिक्त जिल्हाधिकारी (पुनर्वसन)
१३) सर्व जिल्हा पुनर्वसन अधिकारी,
१४) सर्व कार्यासने (मदत व पुनर्वसन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५) निवड नस्ती, कार्यासन र-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय. मुंबई.